**जिल्हाधिकारी, नाशिक कार्यालयाकरिता खाजगी वाहन पुरवठादारांकडून घेण्यात येणाऱ्या वाहनांचे दर करार निश्चित करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक:- वाहन-२१२१/प्र.क्र.४७/का.३१ (शापसे)**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक:- ५ मे, २०२२

वाचा:-

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.डीव्हीसी-१०१७/प्र.क्र.६५/३१, दि.०६.१०.२०१७

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन पत्र क्र.वाहन-१९१९/प्र.क्र.१२२/३१, दि.३१.०८.२०१९

३) जिल्हाधिकारी, नाशिक यांचे पत्र क्र.कक्ष-६/५/निविदा/९८/२०२१, दि.१६.०९.२०२१

प्रस्तावना:-

राज्यात येणाऱ्या राज्य अतिथी / मान्यवर यांच्या परिवहनाकरिता सर्व जिल्हाधिकारी कार्यालयांच्या अधिनस्त डी.व्ही.वाहने ठेवण्यात आली आहेत. तथापि, जिल्ह्याच्या ठिकाणी एकाच वेळी अनेक मान्यवर भेटीसाठी आल्यास व डी.व्ही.वाहने अपुरी पडल्यास खाजगी वाहन पुरवठादारांकडून भाड्याने वाहन उपलब्ध करून घेण्याबाबत दरकरार करण्यात येतो. जिल्हाधिकारी, नाशिक कार्यालयाकडील यापूर्वीचा दरकरार संपुष्टात आल्याने, भाडेतत्त्वावर वाहने घेण्याबाबत जिल्हाधिकारी, नाशिक कार्यालयामार्फत ई-निविदा प्रक्रिया राबविण्यात आली होती. सदर निविदा प्रक्रियेनंतर नाशिक जिल्ह्यासाठी सदरहू ई-निविदा प्रक्रियेतील निविदाधारकास व त्यांनी सादर केलेल्या दरपत्रकास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

जिल्हाधिकारी, नाशिक कार्यालयाकरिता नाशिक जिल्ह्यास भेट देणाऱ्या सन्माननीय अतिथी व मान्यवरांच्या परिवहन व्यवस्थेसाठी शासकीय डी.व्ही.वाहने उपलब्ध नसताना खाजगी वाहन पुरवठादारांकडून भाड्याने वाहने पुरविण्याबाबत ई-निविदाप्रक्रियेमध्ये पात्र झालेल्या श्री गणेश टुर्स अँड ट्रॅव्हल्स, नाशिक या निविदाधारकाची नियुक्ती करण्यास व त्यानी वाटाघाटीअंती सादर केलेल्या दरपत्रकास (सोबतचे विवरणपत्र - अ) निविदेतील अटी व शर्तींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. खाजगी पुरवठादाराकडून भाड्याने वाहने घेण्यासंदर्भात जिल्हाधिकारी, नाशिक यांनी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी :

१) निविदा सूचनांमधील अटी व शर्तींच्या अधीन राहून सोबतच्या विवरणपत्रातील दरांनुसार पुरवठादार मे. श्री गणेश टुर्स अँड ट्रॅव्हल्स, नाशिक यांचेसोबत आवश्यत तो दरकरार तत्काळ करून घेण्यात यावा. तसेच निविदेतील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन होईल असे पहावे.

२) सदर दरकरार या शासन निर्णयाच्या दिनांकापासून, म्हणजेच दिनांक ०५/०५/२०२२ ते दिनांक ०४/०५/२०२४ या दोन वर्षाच्या कालावधीसाठी अंमलात राहील. दरम्यान दिनांक ०१/०९/२०२१ ते दिनांक ०४/०५/२०२२ या कालावधीसाठी दि. ०६.१०.२०१७ च्या शासन निर्णयातील दर कराराप्रमाणे दर लागू राहतील.

३) सदर दर करारामध्ये कोणतेही बदल वा सुधारणा करण्याचे अधिकार अंतिमतः शासनाचे राहतील.

४) वाहन पुरवठा केल्यानंतर त्याबाबतची देयके पुरवठादारांना ३ महिन्याच्या आत अदा करणे अभिप्रेत आहे. त्यासाठी वाहने भाड्याने घेतल्यानंतर जिल्हाधिकारी, नाशिक यांनी वाहन पुरवठ्याबाबतची देयके तत्काळ प्राप्त करून घेऊन ती आपल्या शिफारशीसह ३० दिवसाच्या आत न चुकता शासनास सादर करावीत.

५) संबंधित पुरवठादारांनी वाहनाचा पुरवठा केल्यानंतर त्याबाबतची देयके तत्काळ जिल्हाधिकारी, नाशिक यांना सादर करावीत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२२०५०६११३५५८७२०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KRANTI BHIMRAO PATIL

Digitally signed by KRANTI BHIMRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82bdf2956da62b4fc2f658725d7587906d3cf8eb3117ad97f90ef418d0d39a41, pseudonym=C3D2F9DB5284F5615042877F6E8343E70BF26CFF, serialNumber=4CB4EDEE9A9967B63A896631DCC4A6E70FF0378E5AF6387779BF67DE75ED5B49, cn=KRANTI BHIMRAO PATIL
Date: 2022.05.06 11:37:50 +05'30'

**(क्रांती भी.पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र:- विवरणपत्र**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, नाशिक,
२. जिल्हाधिकारी, नाशिक
३. उप सचिव (आस्थापना) सर्व मंत्रालयीन विभाग
४. सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन -२५
५. वित्त विभाग /व्यय-४, मंत्रालय, मुंबई
६. मे.श्री गणेश टुर्स अँड ट्रॅव्हल्स, शॉप नं.१, रजनी प्रभात अपार्टमेंट, मुंबई नाशिक हाय वे, अश्विन नगर, नाशिक- ४२२ ००९ <shriganeshtravels@ymail.com>
७. निवडनस्ती.

| शासन निर्णय क्र.वाहन-२१२१/प्र.क्र.४७/३१(शापसे), दि. ०५/०५/२०२२ सोबतचे विवरणपत्र - अ<br>जिल्हाधिकारी, नाशिक कार्यालयाकरिता खाजगी वाहन पुरवठादाराकडून घ्यावयाच्या निम्नतम दराचा तक्ता (सर्व करांव्यतिरिक्त) | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | वाहनाचा प्रकार | वाहन वापराचे दर | | | | | | |
| | | ८ तास / ८० कि.मी. करिता दर (रु.) | १२ तास / १२० कि.मी. करिता दर (रु.) | २४ तास / २४० कि.मी. करिता दर (रु.) | ८/१२/२४ तासा पुढील प्रत्येक तासाकरिता (रु.) | ८०/१२०/२४० कि.मी. पुढील प्रत्येक कि.मी. करिता दर (रु.) | ५ दिवस / १२०० कि.मि. (रु.) | एक महिन्याकरिता (रु.) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | स्विफ्ट डिझायर | १७७० | २६०० | ४९५० | ९६ | १७ | २१२५० | ५८००० |
| २ | होंडा अमेझ | १७७० | २६०० | ४९५० | ९६ | १७ | २१२५० | ५८००० |
| ३ | टाटा इंडिगो | १४५० | १८०० | ४००० | ८० | १४ | १७५०० | nil |
| ४ | टोयोटा करोला अल्टीस | २३०० | ३००० | ५५०० | १२० | २३ | ३१००० | ६०००० |
| ५ | होंडा सिव्हीक | २३०० | ३००० | ५५०० | १२० | २३ | ३१००० | ६९५०० |
| ६ | होंडा सिटी | २३०० | ३००० | ५५०० | १२० | २३ | ३१००० | ६९५०० |
| ७ | टोयोटा इनोव्हा क्रिस्टा | २८०० | ३४०० | ६२०० | १८० | २२ | २९९९५ | ८२५०० |
| ८ | टोयोटा इनोव्हा | २७६० | ३९९९ | ५८२५ | १५० | २० | २७००० | ७६००० |
| ९ | टोयोटा फॉर्च्युनर | ३८०० | ४५०० | ६३०० | १७० | २२ | २७००० | nil |
| १० | मर्सिडीज बेंझ | १३००० | २०४०० | ३६००० | १४० | ११० | १८०००० | nil |
| ११ | मिनी बस १७ सिटर | १७६०० | २३५०० | ३६५०० | ३६० | ८५ | १४०००० | nil |
| १२ | मिनी बस ३२ सिटर | २५००० | ३३००० | ६५००० | २५० | ११८ | nil | nil |

*****